**सन २००९-१० च्या टंचाई निवारण कार्यक्रमांतर्गत मौजे रांजणी, ता.कवठेमहाकाळ, जिल्हा सांगली येथील तात्पुरत्या पूरक नळ योजनेस प्रशासकीय मान्यता**

**महाराष्ट्र शासन**
पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
शासन निर्णय क्र. टंचाई १३१०/प्र.क्र.१०/पापु १४
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- **३** फेब्रुवारी, २०१०

**संदर्भ :-** १) शासन निर्णय पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्र. टंचाई १०९९/प्र.क्र.१२/ पापु १४, दि.३.२.१९९९.
२) जिल्हाधिकारी, सांगली यांचे पत्र क्र. रोहयो/टंचाई/आर आर-१७/२०१०, दि. १५.१.२०१०

**प्रस्तावना:-**

ग्रामीण भागातील पिण्याच्या पाण्याच्या टंचाई निवारण कार्यक्रमांतर्गत, जिल्हाधिकारी, सांगली यांनी संदर्भ क्र. २ येथील आदेशान्वये मौजे रांजणी, ता. कवठेमहाकाळ, जि. सांगली येथील पिण्याच्या पाण्याच्या टंचाई निवारणार्थ, रांजणी गावाच्या पूरक नळ पाणी पुरवठा विहिरीपासून (गावठाण हद्दीपासून) ४ कि.मी. अंतरावर गायरान गट नं. १३०८ मध्ये असलेली पाणी पुरवठा विहिर हा उद्‌भव (कार्यान्वित असलेल्या नळ पाणी पुरवठा योजनेपासून ४.०५ कि.मी. अंतरावर असलेला उद्‌भव) घेऊन रु. ९.९६लक्ष किंमतीचा तात्पुरत्या पूरक नळ योजनेचा प्रस्ताव स्थायी आदेशातील भौतिक निकषात बसत नसल्याने विशेष बाब म्हणून शासनाच्या मान्यतेसाठी सादर केला आहे. सचिव स्तरीय स्थायी समितीच्या दिनांक २८ जानेवारी, २०१०रोजी झालेल्या बैठकीत सदर प्रस्ताव विचारात घेण्यात आला.

**शासन निर्णय -**

मौजे रांजणी, ता. कवठेमहाकाळ, जि. सांगली या गावातील पिण्याच्या पाण्याची तीव्र टंचाई विचारात घेता, प्रस्तावनेत नमूद केलेल्या तात्पुरत्या पूरक नळ योजनेच्या **रु.९.९६लक्ष (रुपये लऊ लक्ष शहाण्णव हजार फक्त)** अंदाजित खर्चाच्या प्रस्तावास खालील अटींच्या आधारे **एक विशेष बाब म्हणून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.**

(१) प्रस्तावित तात्पुरत्या पूरक नळ योजनेच्या रु.९.९६ लक्ष **अंदाजित खर्चाच्या ९५ टक्के म्हणजेच, रु.९.४६ लक्ष इतकी रक्कम शासनाकडून अनुदान स्वरुपात उपलब्ध करुन देण्यात येईल.** उर्वरित, **५ टक्के म्हणजेच रु.०.५० लक्ष इतकी रक्कम रांजणी ग्रामपंचायतीने लोकवर्गणीच्या रुपाने स्वतःच्या निधीतून भरावी.**

(२) **सदर योजनेचे काम कोणत्याही परिस्थितीत एक महिन्यात पुर्ण करावे.**

(३) या योजनेच्या देखभाल, दुरुस्ती व व्यवस्थापनाची संपूर्ण जबाबदारी रांजणी ग्रामपंचायतीची राहील. यासाठी शासनाकडून कोणत्याही स्वरुपात अनुदान उपलब्ध करुन देण्यात येणार नाही.

(४) या योजनेच्या कामाच्या प्रगतीबाबत शासनास वेळोवेळी अवगत करण्यात यावे.

२. या कामावरील खर्च, शासनाकडून ग्रामीण भागातील पिण्याच्या पाण्याच्या टंचाई निवारणार्थ घ्यावयाच्या उपाययोजनांकरिता लेखाशिर्ष-२२४५- नैसर्गिक आपत्तीच्या निवारणासाठी सहाय्य-०१- अवर्षण -१०२- पिण्याच्या पाण्याचा पुरवठा -४१- सहाय्यक अनुदाने १०२ (००) (०१) निकडीच्या पाणी पुरवठा योजना (२२४५००९३) (योजनेतर) या लेखाशीर्षाखाली उपलब्ध होणा-या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

३. शासन निर्णय, क्र.टंचाई २००२/प्र.क्र.३४५/पापु १४, दि.२७ नोव्हेंबर २००२ अन्वये पिण्याच्या पाण्याच्या टंचाई निवारणार्थ नागरी व ग्रामीण क्षेत्रातील विहित आर्थिक व भौतिक निकषाबाहेरील तातडीच्या पाणी पुरवठा योजनांना/उपाययोजनांना मंजूरी देण्यासाठी स्थापन करण्यात आलेल्या सचिव स्तरीय स्थायी समितीच्या दि.२८जानेवारी, २०१० रोजी झालेल्या बैठकीत घेण्यात आलेल्या निर्णयानुसार हा शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय शासनाच्या w.w.w.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक **२०१००२०३१७४९४९००१**असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

सही/-

**(ज.बा.कुलकर्णी )**

**कार्यासन अधिकारी , महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. महालेखाकार, (लेखा व परिक्षा /लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१, मुंबई.
२. महालेखाकार, (लेखा व परिक्षा /लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-२, नागपूर.
३. प्रधान सचिव (व्यय) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. प्रधान सचिव, (म.व पु.) महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. प्रधान सचिव, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
६. सचिव (ग्रा.वि.), ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई.
८. विभागीय आयुक्त, पुणे विभाग, पुणे
९. जिल्हाधिकारी, सांगली
१०. मुख्य कार्यकारी अधिकारी ,जिल्हा परिषद, सांगली
११. जिल्हा कोषागार अधिकारी, सांगली
१२. जिल्हा पाणी पुरवठा अधिकारी तथा अधिक्षक अभियंता, सांगली
१३. सरपंच, ग्रामपंचायत रांजणी, ता. कवठेमहाकाळ, जि.सांगली
१४. पापु-१४ संग्रहासाठी